जमीन-सिंधुदुर्ग
मौजे आंबोली, गेळे व चौकुळ, ता.सावंतवाडी
जि. सिंधुदूर्ग येथील कबूलायतदार गावकर
जमिनीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक-२०१६/प्र.क्र.५४५/ज-४अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
१ ला मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ जुलै, २०२३

<u>वाचा:</u> १) महसूल व वन विभाग ज्ञापन क्र.८/जमिन/३९९८/७१/प्र.क्र.३९७/ ज-४, दि. १०/०५/१९९९
२) महसूल व वन विभाग यांचेकडील शुध्दीपत्रक क्र.जमिन-२९९८/अ/ प्र.क्र.३९७/ज-४, दि. १२/०६/२०००
३) विभागीय आयुक्त यांचा प्रस्ताव क्र. मशा/कार्या-६/जमिन (अ) कावि-३२२५४/२०१९ दि.१३.०९.२०१९

<u>प्रस्तावनाः-</u>

मौजे आंबोली, मौजे गेळे व मौजे चौकुळ, ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग येथील शेतकऱ्यांचे कब्जेवहिवाटीत असलेल्या कबुलायतदार गावकर जमिनीच्या प्रश्नाबाबत शासन स्तरावर वेळोवेळी आयोजित करण्यात आलेल्या बैठकीमध्ये दिलेल्या निर्देशानुसार विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांनी त्यांचे दिनांक १३.९.२०१९ च्या पत्रान्वये आंबोली, गेळे, चौकुळ, ता.सावंतवाडी जि.सिंधुदूर्ग येथील शेतकऱ्यांचे कब्जेवहिवाटीत असलेल्या कबूलायतदार गावकर जमिनींच्या प्रश्नाबाबत जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीचा अहवाल शासनास सादर केला आहे. तद्नंतर मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १६.०७.२०२२ रोजी बैठक आयोजीत करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या निर्देशास अनुसरुन मौजे आंबोली व मौजे गेळे येथील राखीव वने व खाजगी वने शेरा असलेली जमीन वगळून कबुलायतदार गावकर जमीन समप्रमाणात वाटपासाठीचा प्रस्ताव मान्यतेसाठी सादर करण्याबाबत तसेच मौजे चौकुळ, ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग येथील ग्रामस्थांनी मौजे आंबोली व मौजे गेळे येथील जमीन वाटपाबाबत अवलंबिलेल्या विहीत कार्यपध्दतीनुसार जमीन वाटपास संमती दर्शविल्यास शासन ज्ञापन तसेच शुध्दीपत्रकान्वये विहित करण्यात आलेला शेतसारा आकारुन जमीन वाटप करण्याबाबत तसेच सार्वजनिक वापरासाठीच्या जागा राखीव करण्यासाठी स्थानिक विधानसभा सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्याची बाब विचाराधीन आहे. सदरच्या समितीमध्ये जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी , सहायक संचालक नगर रचना तसेच संबंधित गावच्या ग्रामपंचायतीच्या सरपंच यांचा समावेश करण्याबाबत तसेच मौजे आंबोली व गेळे गावातील -खाजगी वने◦ असा शेरा असलेल्या कबुलायतदार जमिनीबाबत वन विभागाची मान्यता प्राप्त झाल्यास सदरची जमीन वरील नमूद तत्वानुसार वाटप करण्यात यावी ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. ह्या संदर्भात दिनांक ०४ जुलै २०२३ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचारविनिमय होऊन झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

"कबुलायतदार गावकर पध्दती मौजे आंबोली, मौजे गेळे व मौजे चौकुळ, ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग व्यतिरिक्त महाराष्ट्रात अन्य कोणत्याही ठिकाणी अस्तित्वात नसल्या कारणाने महाराष्ट्र जमीन महसूल (शासकिय जमिनीची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील नियम क्र.५२ मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र जमीन महसूल (शासकिय जमिनीची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील नियम ११ (१) व (२), नियम ११ (३), नियम ११ (४), नियम ११ (५), नियम १२, नियम १४, नियम १५, नियम १७, नियम २४, नियम २६, नियम ३६, नियम ४१ व नियम ४२ शिथील करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

मौजे आंबोली, ता.सावंतवाडी जि.सिंधुदुर्ग या गावातील निव्वळ कबुलायतदार गावकर जमीन एकूण क्षेत्र ६५८-२६.४१ हे.आर पैकी गावठाण व गावठाण विस्तारासाठी तसेच सार्वजनिक सोयी सुविधांकरिता आवश्यक २९.०० हे.आर क्षेत्र वगळून उर्वरित क्षेत्र ६२९-२६.४१ हे.आर आंबोली गावातील प्रवर्ग १ मधील पात्र कुटुंबांना त्यांचे घराखालील क्षेत्रांसह शेती जमीन शासन ज्ञापन तसेच शुध्दीपत्रकान्वये विहित करण्यात आलेला शेतसारा आकारुन समप्रमाणात वाटपास तसेच प्रवर्ग २ मधील कुटुंबांना घराखालील जास्तीत जास्त १५० चौ.मी. क्षेत्र वाटपास शासनमान्यता देण्यात येत आहे.

तसेच मौजे गेळे ता.सावंतवाडी, जि.सिंधुदूर्ग या गावातील निव्वळ कबुलायतदार गावकर जमीन एकूण क्षेत्र २८७-२५.७० हे.आर पैकी गावठाण व गावठाण विस्तारासाठी तसेच सार्वजनिक सोयी सुविधांकरिता आवश्यक २७.०० हे.आर क्षेत्र वगळून उर्वरित २६०-२५.७० हे.आर क्षेत्र पात्र कुटुंबांना कबुलायत गावकर जमीन शासन ज्ञापन तसेच शुध्दीपत्रकान्वये विहित करण्यात आलेला शेतसारा आकारुन समप्रमाणात वाटपास शासनमान्यता देण्यात येत आहे.

मौजे चौकुळ, ता.सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग येथील कबुलयात गावकर जमिनीबाबत जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी मौजे आंबोळी व मौजे गेळे या गावांबाबत अवलंबिलेल्या विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करावा व तद्नंतर तेथील ग्रामस्थांनी समप्रमाणात जमीन वाटपाबाबत संमती दर्शविल्यास मौजे चौकुळ येथील ग्रामस्थांना विहीत कार्यपध्दतीनुसार जमीन वाटप करण्यात यावी.

मौजे आंबोली व गेळे गावातील -खाजगी वने॰ असा शेरा असलेल्या कबुलायतदार जमिनीबाबत वन विभागाची मान्यता प्राप्त झाल्यास सदरची जमीन वरील तत्वानुसार वाटप करण्यात यावी . ज्या शेतकऱ्यांकडे समान वाटपापेक्षा जास्तीची जमीन असेल ती अतिरिक्त जमीन काढून घेऊन, त्या त्या गावातील जमीनीचे शेतीचे प्लॉट तयार करुन पात्र कुटुंबांना जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांचेमार्फत समप्रमाणात जमीन वाटप करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सार्वजनिक वापरासाठीच्या जागा राखीव करण्यासाठी स्थानिक विधानसभा सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात यावी. सदरच्या समितीमध्ये जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी , सहायक संचालक नगर रचना तसेच संबंधित गावच्या ग्रामपंचायतीच्या सरपंच यांचा समावेश करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.सं.क्र.३२०/२०२२/व्यय-९/दिनांक ०४.११.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने व दिनांक ०४.०७.२०२३ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७३११५५२१२१७१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f9815c89488c717b56e1ae0b06802c87d325011b06b9fb279823a37e0511b2, pseudonym=06DBBC5D80F944565DD5BDEF080730B6FF4B904B, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2023.07.31 15:54:44 +05'30'

**(अजित देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.
७. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विकाअ/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई -३२.
९. विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, बेलापूर, नवी मुंबई.
१०. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग, जिल्हा-सिंधुदुर्ग.
११. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई -३२.
१२. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर.
१३. निवडनस्ती -ज-४अ.